**राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर येथे अल्पसंख्यांक समाजातील मुलींसाठी वसतीगृह बांधण्यासाठी प्रस्तावित कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वसगृ-२०११/प्र.क्र.१६४/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
तारीख: १३ ऑगस्ट, २०१४.

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१५(१)/का.८, दि.२४.०३.२०११.
२) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.२५.०३.२०११.
३) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. वसगृ-२०११/प्र.क्र.१६४/का.८, दि.०१.११.२०११.
४) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.बीएमयु-२०१२/(७६/१२)/पुर्नबांधणी-११/विशि-२, दि.२२.०८. २०१२
५) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. वसगृ-२०१२/प्र.क्र.११८/का.८, दि.२२.१०.२०१२.
६) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग क्र. वसगृ-२०१३/प्र.क्र.११६/का.८, दि.२.०१.२०१४.
७) कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, कोल्हापूर यांचे पत्र क्र.प्रशा/इमारती/७९०६/२०१४, दि.१९.०७.२०१४.

**प्रस्तावना -**

शासन निर्णय दि.०१ नोव्हेंबर, २०११ अन्वये कोल्हापूर जिल्हयातील राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर यांचे आवारात अल्पसंख्यांक समाजातील मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी व फर्निचरसाठी रु.४,२२,६१,८९५/- इतक्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून आतापर्यत सर्व निधीचे वाटप करण्यात आलेले आहे. कार्यकारी अभियंता, कोल्हापूर यांचे पत्र दि.१९ जुलै, २०१४ अन्वये रु.४,२२,६१,८९५/- या रकमेतून आतापर्यंत रु.३,७३,००,२००/- इतका वसतीगृहाकरिता खर्च झालेला असून उर्वरित रु.४९,६१,६९५/- इतक्या शिल्लक निधीमधून रु.४९,७१,६०६.५८/- रकमेच्या कामांना मान्यता देणेबाबत प्रस्तावित केले आहे. सदरचे वसतीगृह प्राचार्य, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर यांचेकडे दि.२४ जून, २०१४ रोजी हस्तांतरित करण्यात आले आहे. या प्रस्तावित कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

कोल्हापूर जिल्हयातील राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर यांचे आवारात अल्पसंख्यांक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतीगृहाच्या बांधकामासाठी कार्यकारी अभियंता, कोल्हापूर यांनी रु. रु.४९,६१,६९५/- इतक्या रकमेच्या प्रस्तावित कामाकरिता खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे खर्च अपेक्षित आहे :-

| अ.क्र. | बाब | रुपये |
|---|---|---|
| १ | पार्किंग शेड (दोन चाकी) | १३,३१,७१२/- |
| २ | कॉम्प्युटर लॅब | ११,५१,४६८/- |
| ३ | संकीर्ण कामे | १८,६१,१८४/- |
| ४ | उर्वरित फर्निचर | ३,७६,७६५/- |
| ५ | आर.सी.सी. गेट ॲन्ड चेन लिंक फेन्सिंग | १५,४३,२६४.५८/- |
| | **एकूण** | **४५,०९,३९३.५८/-** |
| ६ | अधिक इन्शुरन्स चार्जेस (१ %) | ४५,०९४/- |
| ७ | अधिक कटिनजन्सी चार्जेस (४ %) | १,८०,३७६/- |
| | **एकूण** | **४७,३४,८६३.५८/-** |
| ८ | अधिक सेंटेज चार्जेस | २,३६,७४३/- |
| | **एकूण** | **४९,७१,६०६.५८/-** |

सदरचा रु.४९,७१,६०६.५८/- इतका खर्च सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या रु.४,२२,६१,८९५/- मध्ये अंतर्भूत आहे. तसेच वसतीगृह प्राचार्य, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर यांचेकडे दि.२७ जून, २०१४ रोजी हस्तांतरित करणेत आले आहे. तरी रु.४९,७१,६०६.५८/- इतक्या खर्चास कार्यात्तर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

वरीलप्रमाणे रु. ४९,७१,६०६.५८/- प्रस्तावित कामांना याव्दारे खालील अटी व शर्तीच्या अधीनतेने सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. वसतीगृहाचे फर्निचर सार्वजनिक बांधकाम विभागाने तयार केलेल्या अंदाजपत्रकानुसार ठरवून तयार करुन घेणे.

२. संबंधित खरेदी शासनाच्या धोरणानुसार/कार्यक्रमानुसार तसेच ज्या ठिकाणी भौतिक आणि वित्तीय प्रमाणके निश्चित केलेली आहेत. त्यानुसार विहीत केलेली असावीत.

३. वसतीगृहाची इमारतीनुसार व आवश्यकतेनुसार फर्निचर तयार करुन घ्यावेत.

४. निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष फर्निचर खरेदी किंवा नवीन बनवू नये.

५. फर्निचर व तदनुषंगिक बाबी खरेदी करताना सक्षम प्राधिकाऱ्यांची मंजूरी घेण्यात यावी.

६. याबाबत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षक अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

७. याबाबतीत एकंदरीत खर्च कोणत्याही परिस्थितीत रु.४,२२,६१,८९५/-इतक्या प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेच्या बाहेर जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१)(०८) शहरामधील अल्पसंख्यांक समाजातील मुलींच्या वसतीगृहाकरिता सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १४२), ३१-सहायक अनुदान या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग एक मधील अ.क्र.२७ नियम क्र.१४९ नुसार सर्व अटी व शर्तीचे पालन करुन प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आणि अपर मुख्य सचिव, यांनी प्रशासनिक विभाग प्रमुख या नात्याने दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१३१०४६१९७४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2014.08.20 18:34:44 +05'30'

**( समीर साळुंखे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.महालेखापाल, (लेखा परिक्षा( महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

२.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५.जिल्हाधिकारी, कोल्हापूर
६.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर
७.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर
८.जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
९.नियोजन विभाग का. १४७५,
१०.वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
११.उप सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती.